मुंबईतील चार व पंच तारांकित हॉटेल्समधील "डिस्कोथेक क्लब" रात्री विहित कालावधीनंतर चालू ठेवण्यास परवानगी देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग [विशेष]
परिपत्रक क्र. आरईएच १९९८/१४०/विशा-५,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक ९ ऑक्टोबर १९९७.

वाचा:- शासन परिपत्रक, गृह विभाग[विशेष], क्रमांक आरईएच ०१८९/विशा-५, दिनांक १०.३.८९.

संदर्भाधिन

शासन परिपत्रक :- शासनाच्या संदर्भाधिन दिनांक १०.३.८९ च्या परिपत्रकान्वये राज्याच्या प्रमुख शहरातील हॉटेल्स, रेस्टॉरंट्स, आपेय गृहे, हॉस्टेल्स, ज्यूस सेंटर इत्यादि स्वरूपाच्या आस्थापना रात्री १२.३० वा. पर्यन्तच चालू ठेवण्यात याव्यात आणि कोणत्याही परिस्थितीत सदर आस्थापनांना कालावधीत वाढ देण्यात येऊ नये अशा सूचना देण्यात आल्या होत्या. मात्र पंच तारांकित हॉटेल्समधील कॉफी शॉपसना यामधून वगळण्यात येऊन पंच तारांकित हॉटेलमधील कॉफी शॉप्स २४ तास चालू ठेवण्यास परवानगी देण्यात आली होती.

२. हॉटेल्स अँण्ड रेस्टॉरंटस् असोसिएशनने [ Western India ] "डिस्कोथेक क्लब" ची सुविधा पुरविणाऱ्या चार व पंच तारांकित हॉटेल्समधील "डिस्कोथेक क्लब" ला रात्री ३.०० वाजेपर्यन्त चालू ठेवण्यास परवानगी देण्याची विनंती केलेली होती. असोसिएशनने दिलेली कारणमिमांसा "डिस्कोथिक क्लब" ची सुविधा पुरविणाऱ्या केंद्र शासनाच्या पर्यटन विभागाच्या सूचना अशा क्लबची मर्यादित संख्या, क्लबमधील प्रवेशावरील बंधने आणि अशा हॉटेल्स आस्थापनांची स्वत:ची सुरक्षा व्यवस्था इ. बाबींची छाननी केल्यानंतर मुंबई शहरातील चार व पंच तारांकित हॉटेलमध्ये "डिस्कोथिक क्लब" ची सुविधा पुरविणाऱ्या क्लबला रात्री ३.०० वाजेपर्यन्त असे क्लब उघडे ठेवण्यास परवानगी दिली तरी जनतेस त्रास होणार नाही आणि कायदा व सुव्यवस्थेचा प्रश्न निर्माण होणार नाही असे शासनाला वाटल्याने पुढील दर्शविलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून पोलीस आयुक्तांनी

संबंधित डिस्कोथेक क्लबला रात्री ३ वाजेपर्यन्त उघडे ठेवण्यास परवानगी देण्यास हरकत नाही असा शासनाने निर्णय घेतलेला आहे.

१. मुंबई शहरातील चार आणि पाच तारांकित आस्थापनांतील केवळ डिस्कोथिक क्लब असलेल्या हॉटेल पुरतीच ही परवानगी मर्यादीत राखणे.

२. सदर क्लब मध्ये कायदा व सुव्यवस्था किंवा नियंत्रण किंवा दुर्घटना घडू नये म्हणून आवश्यक ती काळजी घेण्यासाठी सदर आस्थापना यांनी आपली सुरक्षा यंत्रणा वापरावी.

३. सदर क्लब मध्ये सदस्यांचा प्रवेश हा मर्यादित स्वरूपाचा असावा यासाठी आस्थापनांनी काटेकोरपणे सदस्यांची छाननी करावी.

४. असे क्लब हॉटेलच्या अतिशय आतील बाजूला असावेत व त्याव्दारे जनतेला त्रास होणार नाही किंवा कायदा व सुव्यवस्थेचा प्रश्न निर्माण होणार नाही याबाबतची दक्षता सदर आस्थापनांनी घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

भोसले

[ अ. ना. भोसले ]
कार्यासन अधिकारी, गृह विभाग[ विशेष],
महाराष्ट्र शासन.

प्रति,

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई,
सचिव, पर्यटन विभाग, मंत्रालय,
सचिव परिवहन विभाग, मंत्रालय, मुंबई,
सचिव, उद्योग उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
कामगार आयुक्त, मुंबई.